लातूर जिल्ह्यातील औसा तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून दर्जोन्नत करून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२०/प्र.क्र.७२/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०७ ऑक्टोबर, २०२०.

पहावे :- मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र./मुअऔ /का-१४ /प्रआ /रवियो-०१-२१ /२३१३, दि.२४.०८.२०२०.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी संदर्भाधीन पत्रान्वये लातूर जिल्ह्यातील औसा तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, लातूर यांनी सदर रस्ता दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्याचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, लातूर यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, लातूर यांचा ठराव विचारात घेऊन लातूर जिल्ह्यातील औसा तालुक्यातील खालील रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | साखळी क्रमांक | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १. | इजिमा-९९ नागोबावाडी - भिमानाईक तांडा ते सेलू शिवरस्ता | ०/०० ते ३/०० | ३.०० कि.मी. | ग्रामीण मार्ग-१५१ |
| | **एकूण** | | **३.०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील लातूर जिल्ह्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **०३.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (३७१९.७१ +३.००) म्हणजेच **३७२२.७१ कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२०१००७१५२६०८८४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.10.07 15:27:42 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, उस्मानाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
४) जिल्हाधिकारी, लातूर.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.